प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे या योजनेंतर्गत २३०ए२०९ (कंत्राटी सेवा १०) लेखाशिर्षाखालील"निधीचे पुनर्वितरण करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय-२०२०/प्र.क्र. २१४/व्यशि-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ नोव्हेंबर, २०२०.

वाचा:-

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्र.आयटीआय-२०१०/प्र.क्र.६४/व्यशि-३ दि.२३.०८.२०१०.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२२/कोषा प्रशा-४, दि.२९.०१.२०२०.

प्रस्तावना :-

संदर्भाधिन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्यातील महानगरपालिका क्षेत्रातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी व तिसरी पाळी तसेच उर्वरित ठिकाणच्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसरी पाळी ऑगस्ट-२०१० या शैक्षणिक क्षेत्रापासून सुरु करण्यासाठी आवश्यक असलेल्या १५०० शिक्षकीय पदांना मंजुरी देण्यात आली होती.

२. उपरोक्त १५०० मंजूर पदांपैकी सद्य:स्थितीत ३०९ इतक्या भरलेल्या कंत्राटी तत्वावरील पदांना रु. १५०००/- इतके ठोक वेतन २२३०ए२०९ (०१-वेतन) या उद्दिष्टाखालील उपलब्ध अनुदानातून करण्यात येत होते. तसेच, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सैध्दांतिक व प्रात्यक्षिक तासिका घेण्यासाठी तासिका तत्वावर नियुक्त केलेल्या निदेशकांचे मानधनही २२३०ए२०९ (०१-वेतन) या उद्दिष्टाखाली उपलब्ध अनुदानातून करण्यात येत होते.

३. तसेच, ज्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेस शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेंतर्गत मंजूर तुकडीस शिल्प निदेशकांचे पद मंजूर नाही, अशा ठिकाणी कार्यरत तासिका तत्वावरील शिक्षकीय कर्मचारी व Employment Skills हा विषय शिकविणाऱ्या तासिका तत्वावरील शिक्षकीय कर्मचाऱ्यांचे मानधन २२३०ए२०९ (२८ व्यावसायिक सेवा) उपलब्ध अनुदानातून अदा करण्यात येत होते.

४. तथापि, संदर्भ क्र. २ अन्वये तात्पुरत्या/ कंत्राटी/ हंगामी कर्मचाऱ्यांचे पारिश्रामिक वेतन दि.०१.०४.२०२० पासून "०१-वेतन" या उद्दिष्टाऐवजी "कंत्राटी सेवा १०" या उद्दिष्टाखालील उपलब्ध अनुदानातून अदा करण्याचे निर्देश देण्यात आलेले आहे.

५. सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र. झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, ०३, प्रशिक्षण००३, कारागिर व पर्यवक्षक यांचे प्रशिक्षण (०२) कारागिरांचे तांत्रिक व व्यवसायिक प्रशिक्षण (०२)(०८) प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे (२२३० ए२०९) या लेखाशिर्षांतर्गत "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टांमधून रु.३६०.०० लाख,

"२८-व्यावसायिक सेवा" या उद्दिष्टामधून ६०.०० लाख तसेच "कंत्राटी सेवा १०" या उद्दिष्टामधून रु.१००.०० लाख इतका निधी यापूर्वी वितरीत करण्यात आला आहे.

६. संदर्भ क्र. २ मधील शासन परीपत्रकानुसार सदर अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी "कंत्राटी सेवा १०" या उद्दिष्टाखाली पुनर्वितरण करुन अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

प्रवेश क्षमता वाढविण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचा विस्तार करणे या योजनेच्या २२३०ए२०९ या लेखाशिर्षाखालील २८-व्यावसायिक सेवा या खालील अर्थसंकल्पित निधीपैकी ४० टक्के निधी म्हणजेच रु. २ कोटी ४० लाख इतक्या निधीचे पुनर्वितरण १०-कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली आणि १० कंत्राटी सेवा या उद्दीष्टाकरीता एकूण उपलब्ध निधीच्या ४० टक्के निधी वितरणास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन एकूण रु. ३ कोटी १५ लाख इतका निधी कंत्राटी तत्वावरील व तासिका तत्वावरील निदेशकांचे मानधन अदा करण्याकरीता वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक सं.क्र. १८६/व्यय ६, दिनांक १२/११/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११३१६०६३०६३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Skill Development and Entrepreneurship Department, Government Of Maharashtra, ou=eOffice, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, serialNumber=ecf4a9abe84c70de989c3669424c12b6cadcb583d500fe489ce8727916e0bbee, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2020.11.13 16:08:53 +05'30'

**( संतोष रोकडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सर्व संबंधित सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय (संचालनालयामार्फत).
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी. (संचालनालयामार्फत).
८. अवर सचिव/कक्ष अधिकारी (व्यशि-१)/(व्यशि-२)/(व्यशि-५/रोस्वरो-२), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव (व्यय-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव (का.१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कार्यासन अधिकारी (का.९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती (व्यशि-३), कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.